**जल जीवन मिशनच्या यशस्वी अंमलबजावणी साठी मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे नामनिर्देशन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मजीप्रा-११२०/प्र.क्र.१३९/पापु-२३**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केट जवळ, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
तारीख: २१ ऑक्टोबर, २०२०

वाचा :-

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१० (०७), दिनांक ०४/०९/२०२०

२) **मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर यांचे पत्र क्रमांकः** पा.व स्व.स.सं./पापुशा-०१/प्र.क्र.५५/२०२०, दिनांक ०५/१०/२०२०

प्रस्तावना :-

सन २००९-१० पासून केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम जल जीवन मिशनमध्ये समाविष्ट करून पुनर्रचना करण्याचे केंद्र शासनाने ठरविले आहे. त्यानुषंगाने राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक ०८/०७/२०२० रोजी झालेल्या बैठकीत राज्यात केंद्र शासन पुरस्कृत जलजीवन मिशन राबविण्यास संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

जल जीवन मिशन व स्वच्छता विषयक कार्यक्रमांचे राज्यातील नियोजन, अंमलबजावणी आणि सनियंत्रण याची संपूर्ण जबाबदारी व अधिकार राज्य पाणी व स्वच्छता मिशनला देण्यात आले आहेत. सन २०१९ पासून केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाची पुनर्रचना करून जलजीवन मिशनची सुरुवात केली आहे. परंतु, जलजीवन मिशन अंतर्गत “भारत निर्माण कक्षाकरीता” तरतूद नसल्याने दिनांक ३०/०९/२०२० च्या शासन निर्णयान्वये विभागीय भारत निर्माण कक्ष बंद करण्यात आला आहे.

भारत निर्माण कक्ष बंद झाल्यामुळे ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाचे सनियंत्रण, पाणी पुरवठा योजनांची तांत्रिक छाननी करण्यामध्ये अडचणी येत असल्याची बाब तसेच जिल्हा स्तरावरील माहितीचे समन्वय साधून माहितीचे संकलन करण्यामध्ये अडथळा निर्माण झाल्याची बाब मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांनी शासनाच्या निदर्शनास आणली असून, जल जीवन मिशनचे विभागस्तरावरील सनियंत्रण करण्यासाठी मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, यांच्या

कार्यालयातील अधिकाऱ्यांचे नामनिर्देशन करण्याची विनंती संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये शासनास केली आहे.

## शासन आदेश :-

मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांनी केलेली विनंती विचारात घेऊन, जल जीवन मिशनअंतर्गत ग्रामीण कुटुंबास शुध्द, पुरेसा व शाश्वत पाणी पुरवठा सर्वकाळ आणि सोयीच्या ठिकाणी उपलब्ध करून देण्याचे उद्दिष्ट साध्य करून देण्यासाठी जल जीवन मिशन अंतर्गत जिल्हा परिषद आणि महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत असलेल्या पाणी पुरवठा योजना व तदअनुषंगिक बाबींचे सनियंत्रण करण्यासाठी विभागीय स्तरावर मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या कामांसाठी "सनियंत्रण अधिकारी" म्हणून नेमण्यात येत आहे.

**मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण** - सनियंत्रण अधिकारी - विभागातील जिल्हा परिषदा आणि महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडील जल जीवन मिशन अंतर्गत सर्व प्रकारच्या कामांचे पुनर्विलोकन, सनियंत्रण करणे आणि राज्य शासन व क्षेत्रीय कार्यालये यांमधील दुवा म्हणून काम करण्यासाठी.

संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांचे स्व:पदाचे कामकाज सांभाळून जल जीवन मिशनची जबादारी सांभाळावी. सनियंत्रण अधिकारी म्हणून सोपविलेल्या जबाबदारीकरीता कोणतेही अतिरिक्त वेतन अथवा भत्ता या अधिकाऱ्यांना अनुज्ञेय राहणार नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२११६४३२८९४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.10.21 17:37:13 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, (सर्व).

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त (सर्व).
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
६. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
८. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व नियंत्रण अधिकारी, पर्यवेक्षीय अधिकारी, कार्यासन अधिकारी व सर्व कार्यासने.
९. निवडनस्ती, कार्यासन पापु-२३.